नरिमन पॉईट परिसर/क्षेत्राची सुधारणा व सौंदर्यीकरण करणेबाबतच्या प्रकल्पासाठी मुंबई महानगरप्रदेश विकास प्राधिकरण यांना **'प्रकल्प प्राधिकरण'** म्हणून घोषित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांकः- मुंविप्र.२००९/प्र.क्र.२९/वि.प्र.
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांकः- १८ नोव्हेंबर, २००९

**वाचाः-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग समक्रमांक दिनांक ११ मे,२००९

**प्रास्ताविक-**

नरिमन पॉईट परिसर/क्षेत्राची सुधारणा व सौंदर्यीकरण करण्याबाबतच्या प्रस्तावित प्रकल्पातंर्गत या परिसर/क्षेत्रामध्ये अंमलबजावणी करावयाच्या अन्य प्रकल्पांच्या गरजांचा (उदा. हेलीपोर्ट बांधणे, पश्चिम जलवाहतूक प्रकल्पातंर्गत जेट्टी बांधणे, इत्यादी) अंतर्भाव होणे आवश्यक असून, यादृष्टीने सर्वकंष विचार करुन, नरिमन पॉईट परिसराच्या सुधारणा व सौंदर्यीकरणाचा प्रस्तावित आराखडा सर्व समावेशक असेल हे निश्चित करण्यासाठी एक अभ्यास गट स्थापन करण्याबाबत मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील मुंबई विकास विषयक शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १३ मार्च २००९ च्या बैठकीमध्ये निर्णय घेण्यांत आला आहे. त्यानुसार संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक ११ मे,२००९ अन्वये प्रधान सचिव(१), नगर विकास विभाग यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यास गट गठीत करण्यांत आला आहे. सदर अभ्यास गटाच्या दिनांक ६ जुलै २००९ च्या बैठकीमध्ये नरिमन पॉईट परिसर/क्षेत्राची सुधारणा व सौंदर्यीकरण करण्याबाबतच्या प्रस्तावित प्रकल्पातंर्गत अन्य प्रकल्पांच्या गरजांचा समावेश करुन सदर नरिमन पॉईट परिसर सुधारणा प्रकल्पांतर्गत विविध आवश्यक उपाययोजना व विकासकामे संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांच्या मदतीने राबविण्याच्यादृष्टीने मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांना **'प्रकल्प प्राधिकरण'** म्हणून घोषित करण्याबाबत शिफारस करण्यांत आली आहे. सदर शिफारशीचा विचार करुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

२. नरिमन पॉईट परिसर/क्षेत्राची सुधारणा व सौंदर्यीकरण करणेबाबतच्या प्रस्तावित प्रकल्पातंर्गत या परिसर/क्षेत्रामध्ये अंमलबजावणी करावयाच्या अन्य प्रकल्पांच्या गरजांचा (उदा. हेलीपोर्ट बांधणे, पश्चिम जलवहातूक प्रकल्पातंर्गत जेट्टी बांधणे, इत्यादी) अंतर्भाव करुन नरिमन पॉईट परिसर/क्षेत्र सुधारणा प्रकल्पांतर्गत विविध आवश्यक उपाययोजना व विकासकामे संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांच्या मदतीने राबविण्याच्यादृष्टीने मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांना **'प्रकल्प प्राधिकरण'** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २००९१११८१८४८१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

(रा.तु.जाधव )
उपसचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव(१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई
आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प व्यवस्थापक, मुंबई ट्रान्सफॉर्मेशन सपोर्ट युनिट, मुंबई
सचिव(रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
पोलीस सहआयुक्त(वाहतूक), मुंबई
श्री.नरिंदर नायर, बॉम्बे फर्स्ट, मुंबई
श्री.शिरीष संख्ये, मेकेंझी अॅन्ड कंपनी लिमिटेड, मुंबई
सचिव(विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती(कार्यासन-विशेष प्रकल्प),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.